मौजे वाशिम, जि.वाशिम येथील भाग-३, स. नं. ४०४ मधील ३.५१ हे. आर. इतकी शासकीय जमीन केंद्रीय विद्यालय, वाशिम करीता केंद्रीय विद्यालय संगठन, नवी दिल्ली यांना भोगवटामूल्यरहीत व महसूल मुक्त पध्दतीने नियमित अटी व शर्तीवर ३० वर्षासाठी भाडेपट्ट्याने विशेष बाब म्हणून मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र.जमीन-२०२२/प्र.क्र.१४४/ज-९**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुख्य इमारत, १ला मजला, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :-**

१) सह आयुक्त, केंद्रीय विद्यालय संगठण, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन पत्र F.११०७२-१६(MAHA)/२०१६KVS (Admn.I)/५०५, दि.२५/११/२०१६.

२) सह आयुक्त (Pers), केंद्रीय विद्यालय संगठण, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन पत्र F.११०२९-११/२०१५ KVS (Admn.I)/Vol-III/३०८६, दि.१८/०९/२०१८

३) जिल्हाधिकारी, वाशिम यांचे कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-४/अ.का.(महसूल)/कावि-४८७/२०२२, दि. ०१/०७/२०२२.

४) विभागीय आयुक्त अमरावती यांचे पत्र क्र.अका/जवा/प्र.क्र.५५/कावि-६४८/२०२२, दि.१३/०९/२०२२.

५) जिल्हाधिकारी, वाशिम यांचे कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-४/अ.शा. पत्र क्र.अ.का. (महसूल)/कावि-६४३/२०२२, दि.२१/११/२०२२.

६)जिल्हाधिकारी, वाशिम यांचे कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-४/अ.का.(महसूल) कावि-१२१/२०२३, दि. ०२/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय विद्यालय संगठन, नवी दिल्ली यांचेकडून संदर्भिय पत्र क्र.१ व २ नुसार मौजे वाशिम, भाग ३ येथील स. नं. ४०४ मधील ३.५१ हे. आर. इतकी शासकीय जमीन केंद्रीय विद्यालय, वाशिम करीता उपलब्ध करून देण्याबाबत विनंती करण्यात आली आहे. याअनुषंगाने जिल्हाधिकारी, वाशिम यांनी संदर्भिय पत्र क्र.३, ५ व ६ अन्वये वाशिम जिल्ह्यात केंद्रीय विद्यालयाची स्थापना करण्याकरीता मौजे वाशिम, जि.वाशिम येथील भाग ३, स. नं. ४०४ मधील ३.५१ हे. आर. इतकी शासकीय जमीन राज्य शासनाने भोगवटामुल्यरहित व महसूलमुक्त पध्दतीने मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

वाशिम सारख्या आकांक्षित जिल्ह्यामधील मुला-मुलींना उत्कृष्ट शालेय शिक्षणाची व्यवस्था उपलब्ध करून देणे, केंद्रीय माध्यमिक शिक्षण बोर्ड (CBSE) आणि राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (NCERT) यांच्या सहाय्याने प्रायोगिक व नवकल्पनांचा प्रसार करणे, तसेच, विद्यार्थ्यांमध्ये राष्ट्रीय एकात्मता आणि भारतीयत्वाची भावना रूजविणे या उद्देशांची पुर्तता करण्यासाठी वाशिम जिल्ह्यात केंद्रीय विद्यालयाची स्थापना करण्यासाठी मौजे वाशिम, जि.वाशिम येथील भाग ३, येथील स. नं. ४०४ मधील ३.५१ हे. आर. इतकी शासकीय जमीन भारत सरकारच्या मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अखत्यारित येणा-या केंद्रीय विद्यालय संघठन यांना केंद्रीय विद्यालयाची स्थापना करण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,

१९६६ च्या कलम ३८ व ४० अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार भोगवटामूल्यरहित व महसूल मुक्त पध्दतीने नियमित अटी व शर्तीवर ३० वर्षासाठी भाडेपट्ट्याने देण्याचे व सदर भाडेपट्ट्याचे संबंधित विहित धोरणानुसार नुतनीकरण करण्याची तरतूद भाडेपट्ट्यात अंतर्भूत करण्यास मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात दिनांक २७ जुलै २०२३ रोजी मंत्रीमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मौजे वाशिम, जि.वाशिम येथील भाग ३, स. नं. ४०४ मधील ३.५१ हे. आर. इतकी शासकीय जमीन भारत सरकारच्या मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अखत्यारित येणा-या केंद्रीय विद्यालय संघठन यांना केंद्रीय विद्यालयाची स्थापना करण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३८ व ४० अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार भोगवटामूल्यरहित व महसूल मुक्त पध्दतीने नियमित अटी व शर्तीवर ३० वर्षासाठी भाडेपट्ट्याने देण्याचे व सदर भाडेपट्ट्याचे संबंधित विहित धोरणानुसार नुतनीकरण करण्याची तरतूद भाडेपट्ट्यात अंतर्भूत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती** :-

१) भारत सरकारच्या मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अखत्यारित येणाऱ्या केंद्रीय विद्यालय संगठन यांना वाशिम जिल्हा वाशिम येथे केंद्रीय विद्यालयाची स्थापना करण्याच्या प्रयोजनाकरीता भोगवटामूल्यरहित व महसूल मुक्त पध्दतीने ३० वर्षासाठी भाडेपट्टयाने मंजूर करण्यात आलेली सदर शासकीय जमीन किंवा तिचा कोणताही भाग (किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबध) विक्री/देणगी देऊन/अदला बदल करुन/ गहाण ठेऊन/पट्टयाने देऊन/ खाजगी § सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाव्दारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय हस्तांतरित करता येणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/संस्था/कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार केंद्रीय विद्यालय संगठन यांना करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे पोटविभाजन करता येणार नाही.

२) भारत सरकारच्या मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अखत्यारित येणा-या केंद्रीय विद्यालय, वाशिम यांच्या व्यवस्थापनामध्ये संबंधित जिल्हाधिकारी किंवा त्यांचा प्रतिनिधी यांना सहयोगी करुन घेणे बंधनकारक राहील.

३) विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी करता येईल. अन्य कोणताही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

४) विषयांकित शासकीय जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजुर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त आवश्यकते प्रमाणे अन्य संबधित विभाग/ शासकीय यंत्रणा यांची मान्यता/ पूर्वपरवानगी /ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

५) प्रस्तावित प्रयोजनाच्या व सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश/सूचना या प्रकरणी उक्त संस्थेस बंधनकारक राहतील व त्यानुषंगाने आवश्यक खबरदारी/काळजी घेणे बंधनकारक राहील.

६) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून तीन वर्षाच्या आत बांधकामास सुरुवात करणे बंधनकारक राहील. अन्यथा नियोजित वापर सुरु होईपर्यंत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

७) शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

८) सदर जमीन मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्तींचा भंग झाल्यास जमीन शासनाकडून परत घेण्यात येईल.
९) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती व जिल्हाधिकारी, वाशिम यांना आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.
१०) सदर शासकिय जमीन ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने मंजूर करण्यात आली असून ३० वर्षानंतर भाडेपट्टयाच्या संबंधित विहित धोरणानुसार नुतनीकरण करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९८/२०२३/व्यय-९, दि.१७/०३/२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्र.४४/सांस, दि. ०३/०४/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८१०१८१०४२७२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. VASANT GOPAL MANE

Digitally signed by DR. VASANT GOPAL MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d895943ab6dff272f2ec1bd19f802a1f6a13602188e1b451ba8e7b4359630a60, pseudonym=999F7A73B01EC277FB3617082F8FD2105799C4CB, serialNumber=C621B4190E31904B3DEA97E81C85A31BBAAFF04C1ADEA8A8811D74F01DA4E724, cn=DR. VASANT GOPAL MANE
Date: 2023.08.10 18:13:42 +05'30'

**( डॉ. वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३) मा. उप मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
७) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे वि.का.अ, मंत्रालय, मुंबई-३२.
८) सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
१०) जिल्हाधिकारी, वाशिम.
११) सह आयुक्त, केंद्रीय विद्यालय संगठन, नवी दिल्ली व्दारा जिल्हाधिकारी, वाशिम.
१२) मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (१/२).
१३) वित्त विभाग (का-व्यय ९/साधनसंपत्ती), मंत्रालय, मुंबई.
१४)सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवडनस्ती, कार्यासन ज-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.